**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक - दुरुस्ती-०९२२/प्र.क्र.३२१/पोल-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक - १७ एप्रिल, २०२३.

**विषय** :- पोलिस आयुक्त, बृहन्मुंबई कडील घाटकोपर येथील पंतनगर पोलीस वसाहत इमारत क्र. ८५ या इमारतीच्या आतील व बाहेरील भागाचा गिलावा, रंगकाम व इतर अनुषंगिक बाबी या दुरुस्ती कामांकरिता प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्रमांक: CP/ACS(H)/D-८(१२)/ Bldg Br/ Estimate/SDB/५७/२०, दिनांक : २८/१०/२०२१,

**ज्ञापन-**

पोलिस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने, घाटकोपर येथील पंतनगर पोलीस वसाहत इमारत क्र. ८५ या इमारतीच्या आतील व बाहेरील भागाचा गिलावा, रंगकाम व इतर अनुषंगिक बाबी इ. दुरुस्तीबाबत रु. २,०६,८२,७६०/- (रुपये दोन कोटी सहा लाख ब्याऐंशी हजार सातशे साठ फक्त) इतक्या खर्चाच्या पुढील प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रक रक्कम रु. |
|---|---|---|
| १. | MOW to City Police Qtrs Bldg no.85 at Pantnagar, Ghatkopar East Mumbai Repairs and Renovation of Structural members using Polymer & Micro Concrete Internally & Externally G. Shed over terrace and other mise items, Internal and external pipeline. wooden doors, windows, Aluminium windows, Kitchen Platform, Internal and external plaster, Painting Water-proofing to WC Bath | २,०६,८२,७६०/- |

२. उपरोक्त प्रस्तावामध्ये सादर केलेली कामे उपअभियंता, सार्वजनिक बांधकाम कुर्ला उपविभाग, कुर्ला, मुंबई यांनी सन २०२२-२३ च्या दरसूचीनुसार तयार केली असून, त्या अंदाजपत्रकांना कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी, मुंबई व अधिक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, मुंबई यांनी प्रतिस्वाक्षरी केली असून, **मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान केली** आहे.

३. शा.नि.क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०/०९/२०१९ व वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच व सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परि.क्र. १३४ (३) मधील तरतुदीनुसार रुपये १ कोटीपर्यंतच्या किरकोळ नागरी बांधकामांना प्रशासकीय मान्यतेसह निधी उपलब्ध करुन देण्याचे प्राधिकार विभागप्रमुख यांना देण्यात आले आहेत. त्यावरील १५ कोटी पेक्षा कमी अंदाजपत्रकीय रकमेच्या कामांच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रीय स्तरावरील तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिका-याने तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतर, क्षेत्रीय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता (स्थापत्य) व मुख्य अभियंता (विद्युत) यांच्याकडून शिफारशीसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभागाने त्यांच्याकडील कामाची निकड व अनुदानाच्या उपलब्धतेनुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यास सक्षम असल्याचे नमूद केले आहे. तसेच शासन परीपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, दिनांक २५.०९.२०१९ अन्वये याबाबतच्या सूचना प्रसृत केल्या आहेत.

४. पोलिस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाने, घाटकोपर येथील पंतनगर पोलीस वसाहत इमारत क्र. ८५ या इमारतीच्या आतील व बाहेरील भागाचा गिलावा, रंगकाम व इतर अनुषंगिक बाबी इ. कामांकरिता प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध होण्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून वरीलप्रमाणे सादर केल्यानुसार रु. २,०६,८२,७६०/- (रुपये दोन कोटी सहा लाख ब्याऐंशी हजार सातशे साठ फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रकीय खर्चास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करण्यात येऊ नये.

२. खर्चाचे अंदाज हे सक्षम प्राधिकारी यांनी स्वाक्षांकित करावेत.

३. अंदाजपत्रकात दर्शविण्यात आलेल्या खर्चाच्या मर्यादेत काम पूर्ण करावे.

६. उपरोक्त खर्च " मागणी क्र. बी - १. गृह विभाग, मुख्य लेखाशिर्ष २०५५ पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५००९७), २७- गौण बांधकामे " या लेखाशिषांतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन, या विभागास शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार, तसेच शासन परीपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०/अर्थ-३, दिनांक २५ सप्टेबर, २०१९ अन्वये दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२०१६५६२४८३२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.04.20 17:02:44 +05'30'

**( नारायण बिरा माने )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
३. कार्यकारी अभियंता, सा.बां. उत्तर मुंबई विभाग, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड फाईल (पोल-७).